**शासकीय येणे रक्कमांची वसुली व आढावा घेण्यासाठी जिल्हास्तरीय समिती.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण ९०११/प्र.क्र.५/११/साधनसंपत्ती**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- १८ फेब्रुवारी, २०११.**

**वाचा** (१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक :शामव १००१/प्र.क्र.२१/अर्थबळ, दि. ११/०४/२००१
(२) शासन परिपत्रक क्र.शामव १००१/प्र.क्र.२१/अर्थबळ, दि. ४ मार्च, २००२
(३) शासन परिपत्रक क्र.शामव १००१/प्र.क्र.२१/अर्थबळ, दि.१८ जून, २००२

**शासन निर्णय**

शासकीय व इतर प्रकारच्या शासनास येणे असलेल्या रक्कमांची परिणाम कारक व वेळेवर वसुली होण्याच्या दृष्टीने प्रत्येक जिल्ह्यासाठी शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक :शामव १००१/प्र.क्र.२१/अर्थबळ,दि. ११/०४/२००१ अन्वये संबधित जिल्ह्याच्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली "जिल्हास्तरीय समिती" गठीत करण्यात आली होती. तसेच सदर समित्यांच्या अध्यक्षाना यासंबंधातील तपशिलवार मासिक अहवाल मुख्य सचिव व प्रधान सचिव (वित्त) यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत सादर करुन त्याची प्रत संबधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांचे प्रधान सचिव / सचिव यांना अग्रेषित करण्याचे निदेश देण्यात आलेले होते.

२. जिल्हाधिकारी हे त्यांच्या जिल्ह्यासाठी निश्चित करण्यात आलेले महसूली जमेचे लक्ष्य साध्य करण्याच्या अनुषंगाने, त्यांच्या दैनदिन कर्तव्याचा भाग म्हणून त्यांच्या स्तरावर कार्यवाही करत असल्याने तसेच राज्याच्या महसूल वाढीच्या व महसूल वसूलीच्या अनुषंगाने संबधित विभाग व वित्त विभाग यांच्या मार्फत वेळोवेळी घेण्यात येत असलेला आढावा या सर्व बाबी लक्षात घेवून शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक - शामव १००१/प्र.क्र.२१/अर्थबळ, दि. ११/०४/२००१ अन्वये जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेली "जिल्हास्तरीय समिती" या आदेशाद्वारे आता रद्द करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या जिल्ह्यासाठी निश्चित करण्यात आलेले महसुली जमेचे लक्ष्य साध्य करण्याच्या अनुषंगाने स्वतंत्रपणे कार्यवाही करावी.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०११०२१८२०१७३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(डॉ. प्रदीप व्यास)
सचिव,(व्यय), महाराष्ट्र शासन

प्रत माहितीसाठी
(१) मुख्य सचिव
(२) शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
(३) मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
(४) उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

(५) राज्यपालांचे सचिव
(६) वित्त व नियोजन मंत्री यांचे खाजगी सचिव
(७) वित्त व नियोजन राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
(८) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
(९) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ
(१०) सर्व विभागीय आयुक्त,
(११) पोलीस आयुक्त, मुंबई/पूणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ठाणे/नवीमुबई/सोलापूर/अमरावती
(१२) विक्रिकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य (जिल्हास्तरीय अधिका-यांना कळविण्याच्या विनंतीसह)
(१३) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य (जिल्हास्तरीय अधिका-यांना कळविण्याच्या विनंतीसह)
(१४) राज्य उत्पादन शुल्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य,(जिल्हास्तरीय अधिका-यांना कळविण्याच्या विनंतीसह)
(१५) सहकार आयुक्त, महाराष्ट्र राज्य,(जिल्हास्तरीय अधिका-यांना कळविण्याच्या विनंतीसह)
(१६) महानिरिक्षक, मुद्रांक व नोंदणी, महाराष्ट्र राज्य,(जिल्हास्तरीय अधिका-यांना कळविण्याच्या विनंतीसह)
(१७) सर्व जिल्हा अधिकारी
(१८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
(१९) सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक
(२०) निवड नस्ती